अधीक्षक अभियंता,जलसंपदा ई प्रशासन मंडळ, मंत्रालय मुंबई व त्यांचे अधिपत्याखालील ४ विभाग यामधील नियत अस्थायी आस्थापनेवरील ८८ पदांना दि. ०१/०३/२०१७ ते दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. ईप्रशा २०१७/ (१२/२०१७)/ निवसं-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ०८/०३/२०१७

पहावे : १) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्रमांक ई-प्रशासन-२०१६/(३६/२०१६)लपा-१ दि.०२/०४/२०१६

२) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्रमांक: आस्था २०१६/(२७८/२०१६)/ ल.पा.-१ दिनांक- १७/१०/२०१६

३) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्रमांक: आढावा-२०१६/प्र.क्र.२७४/२०१६/आ.(प्रशि),दिनांक ३.११.२०१६

४) महाराष्ट्र शासन, जलसंपदा विभाग,शासन निर्णय क्रमांक: ईप्रशा-२०१६ /(११८/२०१६)/ निवसं-३, दि.०१/१२/२०१६

५)अधीक्षक अभियंता,जलसंपदा ई प्रशासन मंडळ, मंत्रालय मुंबई यांचे जा.क्रं. ईप्रमं./२०१६/(६९/१६)/आ-२/मुदतवाढ दि.२३/०१/२०१७

**शासन निर्णय-**

अधीक्षक अभियंता,जलसंपदा ई प्रशासन मंडळ,मंत्रालय मुंबई या कार्यालयांतर्गत शासन निर्णय क्र.१ अन्वये मंजूर आकृतीबंधानुसार नियत अस्थायी आस्थापनेवरील ८९ पदांपैकी इतर कार्यालयातून वर्गीकरणाद्वारे उपलब्ध करण्यात आलेल्या एकूण ८३ पदांना संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये तसेच ५ पदांना संदर्भ क्र ४ च्या शासन निर्णयान्वये दि.१/१०/२०१६ ते २८/०३/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती .

२. या निर्णयान्वये आता अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई प्रशासन मंडळ,मंत्रालय मुंबई व या मंडळाच्या अधिपत्याखालील इतर ४ विभाग या कार्यालयांकरिता आकृतीबंधानुसार मंजूर झालेल्या सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या ८९ पदांपैकी वर्गीकरणाचे आदेश नसलेले १ अधीक्षक पद वगळून नियत अस्थायी आस्थापनेवरील ८८ पदांना दि. ०१/०३/२०१७ ते दि.३०/०९/२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे. ही मुदतवाढ खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) उपरोक्त कालावधीसाठी नियत अस्थायी पदांना मुदतवाढ देताना त्या त्या आस्थापनेवरील अस्थायी पदे दीर्घकाळ रिक्त नसतील/व्यपगत झालेली नसतील.

ब) मुदतवाढ मंजुरी द्यावयाची नियत अस्थायी पदे विहित आकृतीबंधातील असावी.

क) अधीक्षक अभियंता,जलसंपदा ई प्रशासन मंडळ,मंत्रालय मुंबई यांचे कार्यालयाने उपलब्ध करुन दिलेल्या प्रस्तावामधील पदांची संख्या /पदामधील घट /पदामधील वाढ /सेवानिवृत्ती

इ.माहिती अंतिम /अचूक आहे असे गृहित धरुन त्यांचे मागणीनुसार पदांना मुदतवाढ देण्यात येत आहे.

ड) या सर्व पदांचा पुढील मुदतवाढीचा प्रस्ताव विनाविलंब सादर करण्यात यावा.

इ) पुढील प्रस्ताव विहित प्रपत्रांत प्रमाणपत्रासह त्या त्या कालावधीच्या दिनांकासहित सादर करण्यात यावेत.

३. सोबत अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई प्रशासन मंडळ,मंत्रालय मुंबई व या मंडळाच्या अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता, माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई, कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे, कार्यकारी अभियंता, बांधकाम व्यवस्थापन संगणकीकरण विभाग, पुणे, कार्यकारी अभियंता, सिंचन व्यवस्थापन संगणकीकरण विभाग, पुणे या कार्यालयांतील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांचा गोषवारा जोडण्यात आला आहे.

४. या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आलेल्या पदांपैकी नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांचा खर्च " लेखाशिर्ष ३४५१-सचिवालयीन-आर्थिक सेवा ०९० - सचिवालय (०१) जलसंपदा विभाग आस्थापना (०१)(०३) ई-गर्व्हनन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (३४५१-२७१९)" या लेखा शिर्षाखाली टाकावा व उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक -पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक १०/०२/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन तसेच आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांचे सहमतीने व प्रधान सचिव (जलसंपदा) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२२१७०३१५१६२७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=544e07f06fbab100dc2bfe33db79fc14350d78d6c16f8feab484d842c496717d, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2017.03.22 17:07:29 +05'30'

**( संजय बेलसरे )**
शासनाचे उपसचिव

**प्रत सहपत्रासह :**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. वित्त विभाग (व्यय - १२) मंत्रालय, मुंबई,
४. वित्त विभाग (अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई,
५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे,
६. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे,
७. अधीक्षक अभियंता,जलसंपदा ई प्रशासन मंडळ,मंत्रालय मुंबई
८. अर्थसंकल्प-२,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. निवसं-३ कार्यासन, संग्रहार्थ.

परिशिष्ठ

शासन निर्णय क्र.ईप्रशा २०१७/(१२/२०१७)/ निवसं-३, दि.०८/०३/२०१७ चे सहपत्र

अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मंत्रालय, मुंबई व त्यांच्या अधिपत्याखालील विभाग निहाय अस्थायी आस्थापनेवरील पदे दि. ०१/०३/२०१७ ते दि. ३०/०९/२०१७ पर्यंत चालू ठेवण्याबाबत

| अ.क्र. | पदनाम | एकूण मंजूर पदे | अधीक्षक अभियंता जलसंपदा ई-प्रशासन मंडळ,मंत्रालय, मुंबई | कार्यकारी अभियंता, माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई | कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे | कार्यकारी अभियंता, बांधकाम संगणकीकरण विभाग, पुणे | कार्यकारी अभियंता, सिंचन व्यवस्थापन संगणकीकरण विभाग, पुणे | मुदतवाढीसाठी आवश्यक अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अधीक्षक अभियंता | १ | १ | ० | ० | ० | ० | १ |
| २ | कार्यकारी अभियंता | ४ | ० | १ | १ | १ | १ | ४ |
| ३ | सहा.अधीक्षक अभियंता | १ | १ | ० | ० | ० | ० | १ |
| ४ | उपकार्यकारी अभियंता | १ | ० | ० | १ | ० | ० | १ |
| ५ | सहा.अभियंता श्रेणी- १/ उप अभियंता | २० | ० | ५ | ५ | ५ | ५ | २० |
| ६ | सहा.अभियंता श्रेणी- २ | २० | ० | ५ | ५ | ५ | ५ | २० |
| ७ | विभागीय लेखापाल | १ | ० | ० | १ | ० | ० | १ |
| ८ | अधीक्षक | १ | ० | ० | ० | ० | ० | ० |
| ९ | लघुटंकलेखक | २ | १ | ० | १ | ० | ० | २ |
| १० | अनुरेखक | ३ | ० | ० | ३ | ० | ० | ३ |
| ११ | भांडारपाल | १ | ० | ० | १ | ० | ० | १ |
| १२ | प्रथम लिपीक | २ | १ | ० | १ | ० | ० | २ |
| १३ | वरिष्ठ लिपीक | ४ | २ | ० | २ | ० | ० | ४ |
| १४ | कनिष्ठ लिपीक नि टंकलेखक | १२ | २ | ३ | ७ | ० | ० | १२ |
| १५ | वाहनचालक | ३ | १ | १ | १ | ० | ० | ३ |
| १६ | शिपाई | १३ | २ | २ | ५ | २ | २ | १३ |
| | एकूण :- | ८९ | ११ | १७ | ३४ | १३ | १३ | ८८ |

टिप : शासन निर्णय क्रमांक : ई-प्रशासन -२०१६/(३६/२०१६)/लपा-१ दिनांक : ०२/०४/२०१६ अन्वये अधीक्षक पदाच्या वर्गीकरणाचे स्वतंत्ररित्या आदेश काढण्यात येणार आहेत.